**कौटुंबिक न्यायालय, ठाणे यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : कौटुंन्या १११८/प्र.क्र.६२/का-नऊ**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक:- ११ मार्च, २०२०.

पहा :- १) न्यायाधीश,कौटुंबिक न्यायालय, ठाणे यांचे पत्र जा.क्र.५८/२०२०, दि.२५.०२.२०२०
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

कौटुंबिक न्यायालय, ठाणे यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये सदर न्यायालयाच्या आस्थापनेवरील २ अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्याची शासनास विनंती केली आहे. संदर्भ क्र. २ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार कौटुंबिक न्यायालय, ठाणे येथील २ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कौटुंबिक न्यायालय, ठाणे यांच्या आस्थापनेवरील लिपिक (१ पद) आणि शिपाई (१ पद) अशा एकूण २ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५ दिवाणी व सत्र न्यायालये-(०१)(०२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, संकेतांक २०१४ ०३४१, ०१- वेतन या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा व तो त्या शीर्षाखालील सन २०२०-२०२१ या वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००३१२१५४८१९२२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.03.12 15:51:39 +05'30'

**(उदय बा. शुक्ल)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,

२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, ठाणे,
३) महालेखापाल-एक (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
४) महालेखापाल-एक ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,
६) वित्त विभाग व्यय-५,
७) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५
८) निवड नस्ती.